**अमरावती येथील अपघात दाव्यातील रु.११,७२,९८७/- इतकी रक्कम संबंधितास अदा करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः दावा-२०२१/ प्र.क्र.२३५/ आरोग्य-४**

मंत्रालय, १० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीखः ०४ ऑक्टोबर, २०२१.

**वाचा** :- संचालक, आरोग्य सेवा (२), आरोग्य सेवा आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्रमांकः ससंआसे /आस्था/५३अ/श्रीम ठाकरे/अपघात दावा/२०६०३-०६/२१, दि.२१.०९.२०२१.

**प्रस्तावना** :-

श्री. अतुल ठाकरे (कंत्राटी लेखापाल एनएचएम) हे शासकीय वाहनातून (ॲम्ब्युलन्स) वाहन क्रमांक एम एच २७/ए ए ५०५४ कर्तव्यावर असताना शासकीय वाहनाचा अपघात दि.१३.०७.२०१२ रोजी होऊन त्यामध्ये त्यांचे अपघाती निधन झाल्यामुळे त्यांची आई व इतर यांनी तक्रार क्रमांक (एम ए सी पी क्रमांक ३३६/२०१२ अन्वये मा. मोटार वाहन अपघात न्यायाधिकरण, अमरावती येथे नुकसान भरपाईपोटी दावा दाखल केलेला होता. सदर दाव्याचा निकाल मा. न्यायाधिकरणाने दि.१७.०१.१७ रोजी दिलेला आहे. त्यानुसार मा. न्यायाधिकरणाने सदर रक्कम अदा करणेबाबतचा हुकूमनामा (जप्ती आदेश) दि.०९.०९.२०२१ रोजी बजावलेला आहे. सदर हुकूमनाम्याच्या अनुषंगाने शासनाकडून सदर रक्कम ही एक महिन्यात अदा केली जाईल असे मा. न्यायाधिकरणात लिखीत स्वरुपात दिलेले आहे. मा. न्यायाधिकरण यांनी दि.०९.०९.२०२१ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरुन संबंधीतास रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय** :-

श्री. अतुल ठाकरे (कंत्राटी लेखापाल एनएचएम) हे शासकीय वाहनातून (ॲम्ब्युलन्स) वाहन क्रमांक एम एच २७/ए ए ५०५४ कर्तव्यावर असताना शासकीय वाहनाचा अपघात दि.१३.०७.२०१२ रोजी होऊन त्यामध्ये त्यांचे अपघाती निधन झाले आहे. याबाबत एम ए सी पी क्रमांक ३३६/२०१२ अन्वये मा. मोटार वाहन अपघात न्यायाधिकरण, अमरावती येथे नुकसान भरपाईपोटी दावा दाखल केलेला होता. सदर दाव्याचा निकाल मा. न्यायाधिकरणाने दि.१७.०१.२०१७ रोजी दिला आहे. त्यास अनुसरुन मा. न्यायाधिकरणाने दि.०९.०९.२०२१ दिलेल्या आदेशास अनुसरुन रु.११,७२,९८७/- (रुपये अकरा लाख, बाहत्तर हजार, नऊशे सत्याऐंशी फक्त) इतकी रक्कम संबंधीतास अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मागणी क्रमांक आर -१, मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६, सार्वजनिक आरोग्य, ००१, संचालन व प्रशासन, (०१) सह संचालक आरोग्य सेवा, पुणे

(भारित) (०१) (०१) सह संचालक आरोग्य सेवा, पुणे (अनिवार्य) (२२१० ४६१५) ५०, इतर खर्च या लेखाशिर्षाखालील सन २०२१-२२ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा :-

<u>अटी व शर्ती</u> :-

१) अर्थसंकल्पात तरतूद उपलब्ध असावी.

२) न्यायालयाच्या अंतिम निर्णयानुसार किंवा न्यायालयीन निर्णयाबाबत पुनर्विलोकन अर्ज किंवा अपील करावयाचे सर्व मार्ग संपल्यास करावयाच्या प्रदानांबाबतच सदर शक्तीचा वापर करण्यात यावा.

३) वेतनश्रेणी सुधारणा, पदनिर्मिती तसेच सेवाविषयक बाबींसाठी सदर शक्तीचा वापर करता येणार नाही.

४) न्यायालयाच्या अंतरिम आदेशानुसार न्यायालयात भरावयाच्या अग्रिम रकमा, ठेवी यासाठी सदर शक्तीचा वापर करता येणार नाही.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अनुक्रमांक-२, नियम क्रमांक ७ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९०७१४५०५२१८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2021.10.04 16:30:08 +05'30'

**प्र. मो. बलकवडे**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

२. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
५. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा),आरोग्य सेवा, पुणे.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
८. उपसंचालक, आरोग्य सेवा (परिवहन), पुणे
९. जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, अमरावती.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
११.वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
१२.अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.